**श्री.सुनिल शिवलाल शिरसाठ, अवैद्यकीय सहायक, पर्यवेक्षकीय नागरी कुष्ठरोग पथक, धुळे यांना अधिसंख्य पदावरुन नियमित सेवेत वर्ग करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण-२०२४/प्र.क्र.४७ /आरोग्य-३**

१० वा मजला, गोकुलदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ०७ मार्च, २०२४.

वाचा :

**१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१/१२/२०१९**

**२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.असंप-२०२०/प्र.क्र.२९/आरोग्य-३, दिनांक-३१/१२/२०२०,दि.०५/०१/२०२१ , दि.१९/०४/२०२२ व दि.२८/११/२०२२.**

**३) सहसंचालक, आरोग्य सेवा(कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे कार्यालय यांचे पत्र जा.क्र. ससंआसे/कुष्ठवक्षय/आस्था-९९(ब/अधिसंख्य पद/२१३१-३२/२४, दि.२५/०१/२०२४**

प्रस्तावना :

सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपील क्र.८९२८/२०१५ (चेअरमन आणि मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरुध्द जगदिश बालाराम बहिरा व इतर) व इतर याचिका यामध्ये दिनांक ६/७/२०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र.३१४०/२०१८ मध्ये दि.२८/९/२०१८ च्या आदेशान्वये मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दि.३१/१२/२०१९ पर्यत कार्यवाही करण्याचे आदेश दिले असल्याने अशा कर्मचारी यांची अधिसंख्य पदे निर्माण करुन या अधिसंख्य पदावर कर्मचारी यांना वर्ग करण्याची कार्यवाही करण्याची सूचना दिली आहे. त्यास अनुसरुन आरोग्य सेवा

आयुक्तालयाच्या अधिपत्याखालील कार्यालयांतील कर्मचाऱ्यांना ११ महिन्याच्या कालावधीसाठी उपरोक्त संदर्भ क्र. २ अन्वये अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली आहेत. आता, सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे यांनी उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक ३ येथील दि.२५.०१.२०२४ च्या पत्रामध्ये नमूद केले आहे की, श्री.सुनिल शिवलाल शिरसाठ यांची शासकिय सेवेत कुष्ठरोग तंत्रज्ञ/अवैद्यकीय सहाय्यक या पदावर मागासवर्गीय/माजी सैनिक/अपंग या प्रवर्गातून नियुक्ती देण्यात आली होती. त्यानुसार श्री. सुनिल शिवलाल शिरसाठ यांनी कोळी-विशेष मागास वर्ग या जातीचे जात प्रमाणपत्र तसेच वैधता प्रमाणपत्र सादर केले आहे. परंतु, जेष्ठतासूचीमध्ये श्री. सुनिल शिवलाल शिरसाठ यांच्या नावासमोर अनुसूचित जमाती प्रवर्ग असे नमुद असल्याच्या कारणास्तव त्यांना अधिसंख्य पदावर वर्ग केलेले आहे. परंतु, मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद यांनी दिलेल्या आदेशानुसार व शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग दि.२१.१२.२०१९ मधील तरतूदीनुसार श्री. सुनिल शिवलाल शिरसाठ यांचे नाव अधिसंख्य पदावरुन वगळून त्यांना शासकिय सेवेत वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:**

श्री. सुनिल शिवलाल शिरसाठ यांना दि.३०.०८.१९९३ रोजी कुष्ठरोग तंत्रज्ञ/अवैद्यकीय सहायक या पदावर मागासवर्गीय/माजी सैनिक/अपंग या प्रवर्गात नियुक्ती करण्यात आली होती. तथापि, जेष्ठता यादीतील त्यांच्या नावासमोर अनुसूचित जमाती प्रवर्ग असे नमुद असल्याच्या कारणास्तव त्यांना अधिसंख्य पदावर वर्ग केलेले आहे. परंतु, श्री. सुनिल शिवलाल शिरसाठ यांची नियुक्ती महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई दिनांक १८.०६.१९९३ च्या शिफारस पत्रानुसार निवड मंडळाच्या यादीत श्री. सुनिल शिवलाल शिरसाठ यांच्या नावासमोर मागासवर्गीय/माजी सैनिक/अपंग असे दर्शविण्यात आले होते त्याप्रमाणे ते इतर मागासवर्गीय असल्याचे जात प्रमाणपत्र व जातपडताळणी प्रमाणपत्र सादर केले आहे. श्री. सुनिल शिवलाल शिरसाठ यांच्या नियुक्ती शिफारसपत्रात अनुसुचित जाती/अनुसुचित जमाती असा कोठेही उल्लेख नाही. तसेच उपविभागीय दंडाधिकारी, धुळे विभाग, धुळे यांनी त्यांना कोळी जातीचे विशेष मागास वर्गाचे जात प्रमाणपत्र व

विभागीय जात पडताळणी समिती नाशिक यांनी श्री. सुनिल शिवलाल शिरसाठ यांना कोळी-विशेष मागास वर्ग या जातीचे जात वैधता प्रमाणपत्र दिलेले आहे. त्यामुळे सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.असंप २०२०/प्र.क्र.२९/आरोग्य-३ दि.३१.१२.२०२० व दि.०५.०१.२०२१ च्या शासन निर्णयातील तसेच तद्नंतर निर्गमित झालेल्या मुदतवाढीच्या शासन निर्णयातील त्यांचे अधिसंख्य पदांवरील नाव वगळून त्यांना नियमित पदावर वर्ग करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

त्याअनुषंगाने श्री. सुनिल शिवलाल शिरसाठ, कुष्ठरोग तंत्रज्ञ/अवैद्यकीय सहायक यांना अधिसंख्य पदावरुन नियमित पदावर पुर्नस्थापित करण्यात येत आहे. तसेच सेवा व वेतन विषयक देय असलेल्या नियमित पदाच्या सर्व सवलती तसेच सेवानिवृतीनंतरचे सर्व लाभ लागू करण्यात येत आहेत.

श्री.सुनिल शिवलाल शिरसाठ यांचे जेष्ठता यादीतील नावासमोर अनुसुचित जमाती प्रवर्ग नमुद केल्याने त्यांना नियुक्तीनंतर अनुसुचित जमाती प्रवर्गाचे लाभ दिले नसल्याची खातरजमा करुनच त्यांना वरील सवलती व लाभ देण्यात यावेत तसेच त्यांचे सेवापुस्तकातही आवश्यक त्या नोंदी व प्रमाणपत्रांची नोंद घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०५१५५९०२९११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA PRADIP PISE

Digitally signed by KAVITA PRADIP PISE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH AND FAMILY WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=895d4dc43ba3105440c0329431446ae8333ab89578925b2d77d3806165dbd487, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AEEF37624AA6E5EA1AAA99D244C6C2A5F135097E5C07486A35D423835B4EC728, cn=KAVITA PRADIP PISE
Date: 2024.03.07 15:29:07 +05'30'

**( क.प्र. पिसे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) महालेखापाल, महाराष्ट्र १/ २, (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.

२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,आयुक्तालय, मुंबई.

३) संचालक १/२, आरोग्य सेवा मुंबई/पुणे.

४) सहसंचालक,आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग) पुणे-६

५) उपसंचालक, आरोग्य सेवा,नाशिक मंडळ, नाशिक

६) संबंधित जिल्हा शल्यचिकित्सक

७) संबंधित कोषागार अधिकारी/ अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई

८) श्री. सुनिल शिवलाल शिरसाठ, अवैद्यकीय सहाय्यक,पर्यवेक्षकीय नागरी कुष्ठरोग पथक, धुळे

९) निवडनस्ती (आरोग्य-३)